**मालेगाव प्रकरणात स्थापित विशेष तपास समितीस (SIT) कायदेशीर सल्ला देण्याकरीता "समुपदेशी (Counsel )" म्हणून नियुक्त ॲड.शिशिर हिरे यांना व्यावसायिक शुल्क मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :-एसपीपी-०२२५/प्र.क्र.३५/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :-०२ मे, २०२५.

**वाचा:-** १. गृह विभाग, कार्यालयीन आदेश क्रमांक व्हीआयपी-०१२५/(HD४५०१३) प्र.क्र.०२/विदेशी-१, दि.०८.०१.२०२५.
२.गृह विभाग, कार्यालयीन आदेश, समक्रमांक, दि.०३ मार्च, २०२५.

**शासन निर्णय :-**

मालेगाव जि.नाशिक येथील बांग्लादेशी/रोहिंग्या नागरीकांबाबत प्राप्त तक्रारींची चौकशीकरीता "विशेष तपास समिती (SIT)" ची संदर्भाधीन क्र.१ येथील दि.०८.०१.२०२५ च्या शासन आदेशान्वये स्थापना करण्यात आलेली आहे. सदरहू स्थापित विशेष तपास समितीस (SIT) कायदेशीर सल्ला देण्याकरीता "समुपदेशी (Counsel)" म्हणून ॲडव्होकेट शिशिर हिरे यांची संदर्भाधीन क्र.२ येथील आदेशान्वये नियुक्ती करण्यात आलेली आहे.

सबब, विशेष तपास समितीस (SIT) कायदेशीर सल्ला देण्याकरीता ॲड. शिशिर हिरे यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक शुल्क/मानधन मंजूर करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**(अ)** बैठकांकरीता मानधन (एका आठवडयातून एका बैठकीकरीता ( -रुपये ५०,०००/- (अक्षरी रुपये पन्नास हजार फक्त)

**(ब)** लिखित मत (Written) -रुपये ६०,०००/- (अक्षरी रुपये साठ हजार फक्त)

उपरोक्त नमूद व्यावसायिक शुल्क/मानधन व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ॲड. शिशिर हिरे यांना अनुज्ञेय होणार नाहीत.

२. संबधित प्रकरणाचे अनुषंगाने होणाऱ्या बैठकीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त/ पोलीस अधीक्षक यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्रमांक बी-१, २०५५ पोलीस -(००)१०९, जिल्हा पोलीस (००)(०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८)- २८ व्यावसायिक सेवा" या लेखाशीर्षाखालील त्या-त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १९१/२०२५/व्यय-७, दि.१९/०३/२०२५ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र. २०२५०५०२१५१३०७६८२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MURLIDHAR
MADANRAO MUNDE

Digitally signed by MURLIDHAR MADANRAO MUNDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=6ce40b982ce0fd403128e2717e7e0c7b7377fd69d7d23790cb110e33b1e0491e, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=716527D5A822F9E40134FCE6C6C6B8E1521D5C66E1D2D46A3F04B04DE16DF388, cn=MURLIDHAR MADANRAO MUNDE
Date: 2025.05.02 15:13:42 +05'30'

**(मुरलीधर मुंडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, शहीद भगतसिंग मार्ग, कुलाबा, मुंबई-१.
२) विशेष पोलीस महानिरीक्षक, नाशिक परिक्षेत्र, नाशिक.
३) पोलीस अधीक्षक, नाशिक ग्रामीण.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) महाराष्ट्र- १, मुंबई.
५) कोषागार अधिकारी, नाशिक.
६) विधि व न्याय विभाग (कार्यासन-१४), मंत्रालय, मुंबई.
७) वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
८) ॲड.श्री. शिशिर हिरे, “सावित्री”,महात्मा गांधी मार्ग (कॅम्प रोड), मालेगाव-४२३ २०३.
९) निवडनस्ती पोल-१०.